“स्वराज्य रक्षक धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान स्थळ मौजे तुळापूर, ता.हवेली व समाधी स्थळ स्मारक वढु (बु.) शिरुर,जि.पुणे”आराखडयाकरिता नवीन लेखाशिर्षास मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२२/प्र.क्र.८९/का.१४४४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २७ मार्च, २०२३.

वाचा : १) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्रमांक: तीक्षेवि-२०२१/प्र.क्र.८२ /का-१४४४. दिनांक : २८ जून, २०२२.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्रमांक: तीक्षेवि-२०२१/प्र.क्र.८२ /का-१४४४. दिनांक : १० मार्च, २०२३.

**प्रस्तावना :-**

तत्कालीन मा.उपमुख्य मंत्री (वित्त व नियोजन) यांनी सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय भाषणात “महाराष्ट्राची अस्मिती, स्फूर्तीस्थान, स्वराज्य रक्षक छत्रपती संभाजी महाराज यांच्या स्मृती दिनाचे औचित्य साधून छत्रपती संभाजी महाराजांच्या कार्यकतृत्वाला साजेसे स्मारक वढु बुद्रुक व तुळापूर, ता.हवेली जि.पुणे या परिसरात उभारण्याचे शासनाने ठरविले आहे”, असे घोषित केले आहे. तसेच यासाठी रु.२५० कोटी एवढा निधी उपलब्ध करुन देण्यात येणार असल्याचे अर्थसंकल्पिय भाषणात नमूद केले आहे.

त्यास अनुसरुन नियोजन विभाग, शासन निर्णय दि.२८ जून, २०२२ अन्वये “स्वराज्य रक्षक छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान स्थळ मौजे तुळापूर, ता.हवेली व समाधी स्थळ स्मारक वढु (बु.) शिरुर, जि.पुणे” विकास आराखडयास मान्यता देण्यात आली असून, सदर आराखडया अंतर्गत रु.२६९.२४ कोटी किमतीच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. नियोजन विभाग, शासन निर्णय दि.१०.०३.२०२३ अन्वये सदर विकास आराखडयाच्या नावात अंशत: बदल करुन सुधारित नाव “स्वराज्य रक्षक धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान स्थळ मौजे तुळापूर ता.हवेली व समाधी स्थळ स्मारक वढु (बु.) शिरुर, जि.पुणे विकास आराखडा” असे निश्चित करण्यात आले आहे.

“स्वराज्य रक्षक धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान स्थळ मौजे तुळापूर ता.हवेली व समाधी स्थळ स्मारक वढु (बु.) शिरुर जि. पुणे- विकास आराखड्या” अंतर्गत कामांची प्रत्यक्षात अंमलबजावणी करून घेण्यासाठी जिल्हाधिकारी, पुणे यांना “संनियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर आराखडया अंतर्गत समाविष्ट मंजूर कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याकरिता निधीच्या वितरणासाठी नियोजन विभागामार्फत स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“स्वराज्य रक्षक धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान स्थळ मौजे तुळापूर ता.हवेली व समाधी स्थळ स्मारक वढु (बु.) शिरुर जि. पुणे- विकास आराखड्या” अंतर्गत आराखडयातील कामे विहित केलेल्या कालमर्यादेत पूर्ण होण्याकरिता जिल्हाधिकारी, पुणे यांची “संनियंत्रण अधिकारी”

म्हणून त्यांच्या अधिपत्याखाली राबविण्यासाठी खालीलप्रमाणे **नवीन लेखाशिर्ष** सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

***मागणी क्रमांक ओ-८***
**३४५२, पर्यटन**
०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा
१०१-पर्यटन केंद्रे
(००)( १५)"स्वराज्य रक्षक धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान व समाधी स्थळ स्मारक जि.पुणे विकास आराखडा"
(३१)- सहायक अनुदाने (वेतनेतर)
कार्यक्रम/ दत्तमत (३४५२ ३०४८)

***मागणी क्र. ओ-१०***
५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च
०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा
१०१-पर्यटन केंद्रे
(००) ( १४ ) "स्वराज्य रक्षक धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज यांचे बलिदान व समाधी स्थळ स्मारक जि.पुणे विकास आराखडा"
(५३) मोठी बांधकामे
कार्यक्रम/दत्तमत **(५४५२** ०२०२ )

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक: १२/अर्थ-१६, दि.०४.११.२०२२ अन्वये व महालेखापाल यांच्याकडील अनौपचारीक संदर्भ क्रमांक: सं.ख.वि./चा-१/नियोजन विभाग/यूओआर-१२७/२०२२-२३/६३८, दिनांक २८.११.२०२२ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२७२०००१३२६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, pseudonym=F52EF95C5AE57B2B7645FA5EC3BC8FC14C4F892B, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2023.03.27 20:05:36 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
४) जिल्हाधिकारी, पुणे.

५) जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७) अपर मुख्य सचिव, नियोजन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
८) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.

---------------